कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावरुन
अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावर
पदोन्नती / पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन आदेश क्रमांकः पीओजी-१२१६ /प्र.क्र. ३५५ (१) /सेवा-१

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १२ मे, २०१७

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गात कार्यरत श्री. डी. जी. सोनटक्के यांना, अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदासाठी दिनांक ९.६.१९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार, अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावर पी.बी.-३ वेतन बँड रूपये १५६००-३९१०० ग्रेड वेतन ७६००/- या वेतनसंरचनेत तदर्थ तत्वावर पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीनंतर अधीक्षक अभियंता (स्थापत्य) म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | कार्यरत असलेले ठिकाण | पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. डी. जी. सोनटक्के (खुला) | कार्यकारी अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नागपूर | अधीक्षक अभियंता, नागपूर महानगरपालिका, नागपूर | (रिक्त पदी) |

२. श्री. डी. जी. सोनटक्के यांची पदोन्नती ही तदर्थ व तात्पुरत्या स्वरुपाची असून त्यामुळे त्यांना ज्येष्ठतेसंबंधी कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. श्री. सोनटक्के यांची सदर पदोन्नती तदर्थ तत्वावर, तसेच पुढे नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून करण्यात येत आहे :-

*i) सदर तदर्थ पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ (स्टॅम्प क्र. ७२५६/२०१५) (महाराष्ट्र राज्य विरुद्ध श्री. विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणांमध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे,*

*ii) पदोन्नती कोट्यात तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येणाऱ्या तदर्थ पदोन्नत्या ११ महिने किंवा अन्य कोणत्याही कारणामुळे उपलब्ध पदांमध्ये बदल झाल्यास वरिष्ठ संवर्गात तात्पुरते पदोन्नत अधिकारी पदावनत झाल्यास इत्यादी कारणामुळे पदोन्नतीसाठी पदे उपलब्ध न झाल्यास यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीपर्यंत सुरु राहील.*

*iii) सदर पदोन्नतीमुळे मिळणारी नियुक्ती हा कोणताही हक्क असणार नाही. त्यांना देण्यात आलेली ही तदर्थ पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.*

४. संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी त्यांच्याशी संबधित अधिकाऱ्यांना त्यांच्या नवीन नियुक्तीच्या जागी रूजू होता यावे म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करून पदमुक्त करावे

व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे. तसेच पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे पदभार सोडल्याचा तसेच स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा.

५. श्री. सोनटक्के यांनी त्यांच्या पदोन्नतीच्या पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. नियुक्तीच्या ठिकाणी एक महिन्याच्या आत हजर होणे बंधनकारक आहे, याचीही त्यांनी नोंद घ्यावी. तसेच, श्री. सोनटक्के यांचे लक्ष शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र. ३०३/का. १२, दिनांक १२.९.२०१६ कडे वेधण्यात येत आहे.

६. श्री. सोनटक्के यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये. श्री. सोनटक्के यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

७. श्री. सोनटक्के यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर नियुक्ती / पदस्थापना देण्यात आलेली आहे. सदर नियुक्ती ही महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट दोन मध्ये विहित केलेल्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

८. श्री. सोनटक्के यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होताच पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे यांना कळवावा.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१२१८३८४४१२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.05.12 18:35:13 +05'30'

**( अ.ज.कांबळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. महानगरपालिका आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर,
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर/ विशेष प्रकल्प, मुंबई /राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,

६. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
७. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
९. श्री. डी. जी. सोनटक्के, कार्यकारी अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नागपूर,
१०. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
११. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१४. सामान्य प्रशासन विभाग, का.-१३/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१६. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१७. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१८. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१९. प्रधान सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
२०. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
२१. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. कार्यासन आस्था-१, आस्था- ३, सेवा-६, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३. निवडनस्ती.